सन २०२४-२५ मध्ये जिरायती क्षेत्र विकास कार्यक्रमाच्या वार्षिक कृति आराखड्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राशेअ-४४२४/प्र.क्र. १२७/८-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २८ मे, २०२४.

**संदर्भ:-**

१. केंद्र शासनाने www.agricoops.nic.inया सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचना.
२. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३१/१७-अे, दि.१९.०४.२०१७.
३. केंद्रीय वित्त मंत्रालय यांचे पत्र क्र.F.NO. १३-४/२०२३/PC, दि. ०४.०३.२०२४
४. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, कृषि व शेतकरी कल्याण विभाग, पत्र क्र. ७-१/२०२४ RKVY, दि. १४.५.२०२४
५. कृषि विभाग पत्र क्रमांक CSS-२०२४/C.R. १२/२-A, दि. १३.०५.२०२४
६. केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, कृषि व शेतकरी कल्याण विभाग, पत्र क्र. ४-२/२०१९RFS-III(FTS-E७९५०३), दि. २०.५.२०२४
७. कृषि संचालक (वि. व प्र.) यांचे पत्र क्र.कृआ/कोक्षेवि/वा.कृ.आ/र-४०/२०२४, दि. १६.०५.२०२४

**प्रस्तावना :**

सन २०२२-२३ पासून राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत जिरायती क्षेत्र विकास योजनेची अंमलबजावणी होत असून केंद्र व राज्य हिश्श्याचे अनुदानाचे प्रमाण ६०:४० असे आहे. सदर योजना राबविण्याबाबत केंद्र शासनाने सं.क्र. ६ येथील पत्रान्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. केंद्र शासनाने दिनांक १४.५.२०२४ च्या पत्रान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजना (RKVY) अंतर्गत जिरायती क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी सन २०२४-२५ मध्ये केंद्र हिश्श्यासाठी रु.२२००.०० लाख रकमेची तरतूद केली असून त्या प्रमाणात राज्य हिश्श्याची तरतूद करण्याबाबत कळविले आहे.

राष्ट्रीय कृषि विकास योजना कॅफ्टेरिया अंतर्गत समाविष्ट केल्यामुळे मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील राकृवियोच्या राज्य स्तरीय मंजूरी समितीच्या दि. ३.५.२०२४ रोजीच्या बैठकीत केंद्र हिस्सा रु.२२००.०० लाख व त्यासाठीचा समरुप राज्य हिस्सा रु. १४६६.६७ लाख याप्रमाणे एकूण रु.३६६६.६७ लाख निधीच्या वार्षिक कृति आराखडयास मान्यता दिली आहे. त्यानुसार राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत जिरायती क्षेत्र विकास योजनेस सन २०२४-२५ साठी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास योजनेस सन २०२४-२५ मध्ये संदर्भिय राज्यस्तरीय मंजूरी समितीच्या मान्यतेस व केंद्र शासनाच्या दि. १४ मे, २०२४ रोजीच्या पत्रान्वये मंजूर नियतव्ययास अनुसरुन केंद्र हिस्सा रु. २२००.०० लाख व त्यासाठीचा समरुप राज्य हिस्सा रु.१४६६.६७ लाख याप्रमाणे एकूण रु. ३६६६.६७ लाख निधीच्या वार्षिक कृती आराखडयास पुढीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

रुपये लाखांत

| प्रवर्ग | केंद्र | राज्य | एकूण |
|---|---|---|---|
| **सर्वसाधारण** | **१७३४.००** | **११५६.००** | **२८९०.००** |
| **अनुसूचित जाती** | **२६०.००** | **१७३.३३** | **४३३.३३** |
| **अनुसूचित जमाती** | **२०६.००** | **१३७.३४** | **३४३.३४** |
| **एकूण** | **२२००.००** | **१४६६.६७** | **३६६६.६७** |

२. सदर वार्षिक कृति आराखड्यामधील पिकनिहाय तसेच घटक/उपघटक निहाय मंजूर आर्थिक व भौतिक लक्षांकाचे विवरण सोबतच्या **परिशिष्ट-अ** मध्ये नमूद केले आहे. सदर अभियानाची केंद्र व राज्याच्या ६०:४० अशा आर्थिक सहभागाच्या प्रमाणात अंमलबजावणी करावी.

३. केंद्र शासनाच्या दिनांक २० मे, २०२४ रोजीच्या पत्रान्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनानुसार सदर योजनेची अंमलबजावणी करण्यात यावी. संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी राज्यस्तरावरून अभियानाचे संनियंत्रण करावे, त्याप्रमाणे अभियानाची प्रभावी अंमलबजावणी व संनियंत्रणाकरिता वेळोवेळी अधिनस्त कार्यालयांना निर्देशित करावे.

४. सदर अभियानाच्या अंमलबजावणीकरीता केंद्र व राज्य हिश्श्याचा निधी प्रवर्गनिहाय ६०:४० या प्रमाणात वेळोवेळी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे आयुक्त (कृषि) यांना उपलब्ध करुन देण्यात येईल. सदर निधी केंद्र व राज्य हिश्श्याच्या पुढील लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ करिता केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची टाकावा.

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|---|
| **सर्वसाधारण** | **मागणी क्र.डी-३,** २४०१-पीक संवर्धन, १०९-विस्तार व प्रशिक्षण, ००१-माहिती व प्रचार, (०१)(५१)- कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान - जिरायती क्षेत्र विकास कार्यक्रम (केंपुयो) (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम) (२४०१ ९५५४) ३३, अर्थसहाय्य. | **मागणी क्र.डी-३,** २४०१-पीक संवर्धन, १०९-विस्तार व प्रशिक्षण, ०१-माहिती व प्रसारण, (०१)(५३)- कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान - अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम (केंपुयो) (राज्य हिस्सा ४०%), (२४०१ ए २७२) ३३- अर्थसहाय्य. |
| **अनुसूचित जाती** | मागणी क्र. एन-३, २४०१ -पीक संवर्धन,(७८९) अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना (०१) (०९) (०९) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (केंद्र हिस्सा ६० टक्के) (कार्यक्रम) (२४०१ बी १६१) ३३- | मागणी क्र. एन-३, २४०१ -पीक संवर्धन,(७८९) अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना (०१) (०९) (०९) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम) (२४०१ बी १७९) ३३-अर्थसहाय्य |

| | | |
|---|---|---|
| | अर्थसहाय्य | |
| **अनुसूचित जमाती** | **मागणी क्र.टी-५,** २४०१ -पीक संवर्धन, (७९६) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१)(१९) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान-अवर्षण क्षेत्र विकास कार्यक्रम व हवामान बदल शाश्वत शेती संनियंत्रण प्रतिमानकरण व आंतरजाल कार्यक्रम (केंपुयो) (केंद्र हिस्सा ६०%) (जनजाती क्षेत्र उपयोजना) (कार्यक्रम) (२४०१ ए ५३९) ३३ अर्थसहाय्य. | **मागणी क्र.टी-५,** २४०१-पीक संवर्धन, (७९६) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१)(२०) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान-अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम व हवामान बदल शाश्वत शेती संनियंत्रण, प्रतिमानकरण व आंतरजाल कार्यक्रम (केंपुयो) (राज्य हिस्सा ४०%) (जनजाती क्षेत्र उपयोजना) (कार्यक्रम) (२४०१ ए ५४८) ३३ अर्थसहाय्य. |

६. केंद्र शासनाने सदर अभियानांतर्गत विहित केल्याप्रमाणे अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती तसेच महिला शेतकरी लाभार्थ्यांना लाभ द्यावा.

७. केंद्र शासनाने संदर्भाधीन दि.२३ मार्च, २०२१ च्या ज्ञापनाद्वारे सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीच्या सुधारीत कार्यपध्दतीनुसार व संदर्भाधीन दि.०२ ऑगस्ट, २०२१ च्या शासन निर्णयान्वये केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापनासाठी अंतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास योजना SNA मार्क केली आहे.

८. या अभियानांतर्गत विविध निविष्ठांच्या खरेदीसाठी (खते, औषधे, बियाणे, सिंचन साधने, यंत्र/औजारे इ.) शासनाच्या प्रचलित धोरणानुसार थेट लाभार्थ्यांच्या बँक खाती अनुदान थेट लाभ हस्तांतरणामार्फत जमा करावे. सदर निविष्ठांची खुल्या बाजारातून खरेदी करण्याचे स्वातंत्र्य लाभार्थ्याला राहील. तथापि, या अभियानांतर्गत शासकीय संस्थांनी/शासनाच्या सार्वजनिक उपक्रमांनी उत्पादित केलेल्या निविष्ठाचा पुरवठा केल्यास संदर्भांकीत शासन निर्णय दि.१९.४.२०१७ नुसार कार्यवाही करावी.

९. कृषि विभागाच्या योजनांची महाडीबीटी पोर्टलद्वारे अंमलबजावणी करण्याबाबत शासन परिपत्रक दि.०४.११.२०२० नुसार कृषि यांत्रिकीकरण, सिंचन साधने व सुविधा, प्रमाणित बियाणे वितरण व पिक प्रात्यक्षिके या बाबींची अंमलबजावणी करावी.

१०. संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकाऱ्यांनी/तालुका कृषि अधिकाऱ्यांनी अभियानाकरीता लाभार्थींची निवड करुन अभियानांतर्गत समाविष्ट कार्यक्रम राबविण्याच्या दृष्टीने लाभार्थ्यांची यादी तालुका स्तरावर संकलित करावी. सदर यादीमध्ये शेतकऱ्यांचे नांव, गांव, सर्वे/गट क्रमांक या बाबींसह भ्रमणध्वनी/दूरध्वनी क्रमांक, बँक खाते क्रमांक, आधार क्रमांक इ. बाबतच्या माहितीचा अंतर्भाव असावा. त्याचप्रमाणे अभियानांतर्गत निवडलेल्या लाभार्थ्यांची यादी निधी प्राप्त झाल्यापासून १५ दिवसांत कृषि विभागाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकाऱ्यांची राहील.

११. सदर लाभार्थांच्या यादीनुसार सर्व लाभार्थी शेतकऱ्यांच्या शेतावर हाती घेतलेल्या कार्यक्रमाची प्रत्यक्ष तपासणी त्या-त्या गावातील कृषि सहाय्यकांनी करावयाची असून, त्यांनी आपला अहवाल तालुका कृषि अधिकाऱ्यांमार्फत जिल्हा अधिक्षक कृषि अधिकाऱ्यांना सादर करावा. त्याचप्रमाणे, कृषि सहाय्यकांचे अहवाल प्राप्त होताच सदर कार्यक्रमांतर्गत राबविलेल्या कामांच्या पर्यवेक्षीय तपासणीचे उचित प्रमाण संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी मार्गदर्शक सूचनेमध्ये विहित करावे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध केला असून त्याचा संकेताक २०२४०५२८१७२१३९०५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

SANTOSH BANSIRAO KARAD

Digitally signed by SANTOSH BANSIRAO KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=f981d5a9fec2e5d5dc36f39695b5f0e4ff5b340cd5420df7cbaa28990d692e36, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=90BBB9D3E7E74DE43F8070E2A9A65BFD42747F1995A4F22FDC0240939AAB0835, cn=SANTOSH BANSIRAO KARAD
Date: 2024.05.28 17:35:08 +05'30'

**( संतोष कराड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
२. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळ, अंधेरी,मुंबई.
४. जिल्हाधिकारी (सर्व)
५. मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व जिल्हा परिषदा)
६. मुख्य कार्यकारी अधिकारी,वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा,पुणे
७. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
८. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
९. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१०. सर्व कृषि विकास अधिकारी/सर्व उपविभागीय कृषि अधिकारी/सर्व तालुका कृषि अधिकारी/सर्व मंडळ कृषि अधिकारी
११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर
१३. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१४. संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
१५. सहायक संचालक(लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१६. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी
१७. उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण/ नाशिक/ पुणे/औरंगाबाद/ अमरावती/ नागपुर
१८. उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
१९. सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
२०. नियोजन विभाग (का-१४३१), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२१. वित्त विभाग (का. व्यय-१/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय,मुंबई
२२. निवडनस्ती ८-अे

# शासन निर्णय क्र. राशेअ ४४२४/प्र.क्र. १२७/८-अे, दि. २८ मे, २०२४ सोबतचे

# परिशिष्ठ-अ

**RKVY- Rainfed Area Development (RAD)**
**Format-II**

**Rs. In Lakh**

**Number of Clusters : 180**
**Total Area proposed for development : 8400 Ha.**
**Total No. of Beneficiaries : 8400**

| Sl. No. | Name of the Activities / Projects / Sub – Components | Physical Outlay as approved by SLSC (No/Units/etc) | Financial Outlay as approved by SLSC (Rs. in lakh) | Final Remarks / Observation of SLSC |
|---|---|---|---|---|
| **A** | **Regular Programme 2024-25** | | | Approved by SLSC |
| 1 | Integrated Farming systems - Crops (Millet crops / oilseed / pulses / Vegetables / fodder) + Trees (Horticulture / Agro Forestry ) + Livestock (Milch cows / Buffaloes / small ruminants (10 animals – Sheep or Goat ) / 50 birds (Poultry) | 8400 | 1512.00 | |
| 2 | (i) Silage Unit- 10 Plastic bags with provision of chaff cutter & Weighing balance / (ii) Fisheries (Fingerlings) unit – in ponds or rice field / (iii) Apiculture (Bee keeping) – one unit per farm under plantation / Millets / Crops | 8400 | 1008.00 | |
| 3 | Capacity Building – Monitoring and capacity building of the beneficieries through Community Resource Persons (CRPs) under SRLM, Self Help Groups, Champion Farmers under NF programme etc. | 7200 | 18.00 | |
| 4 | Administrative Cost | -- | 50.83 | |
| | **Total - A** | **8400** | **2588.83** | |
| 5 | **Pending Liability 2023-24** | **--** | **1077.84** | |
| | **Grand Total** | **8400** | **3666.67** | |
| | GOI share 60% | | 2200.00 | |
| | State Share 40% | | 1466.67 | |